**मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विद्युत विभाग, मुंबई कार्यालयाचा तसेच त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांचा आकृतीबंध मंजूर करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी-२०१६/प्र.क्र.८०/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दि. १७ नोव्हेंबर, २०२०

**<u>संदर्भ :</u>** १) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. ईएसटी-१००८/प्र.क्र.३६५/०८/ प्रशासन-१ दि. ०३ ऑक्टोबर, २०११
२) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. ईएसटी-२०११/प्र.क्र.१२७/ प्रशासन-१ दि. १८ जून, २०१२
३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१४/प्र.क्र.५८८/ ऊर्जा-२, दि. २६ फेब्रुवारी, २०१५
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/विसु-०१ दि.११ फेब्रुवारी, २०१६
५) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. पदनि-०६१७/प्र.क्र. २०/आपुक दि.२९ जून, २०१७

**<u>प्रस्तावना -</u>**

सार्वजनिक बांधकाम विद्युत शाखेचा यापूर्वीचा आकृतीबंध शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग दि. ३ ऑक्टोबर, २०११ अन्वये मंजूर झाला आहे. सदर आकृतीबंध मंजूर होताना ऊर्जा विभागांतर्गत निरीक्षण शाखा व सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत विद्युत शाखा यांमधील प्रशासन एकत्रितरित्या सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखाली राबविण्यात येत असल्याने कमीत कमी पदसंख्या ठेवून शासकीय काम पार पाडण्याच्या दृष्टीने आवश्यक असणारी काही पदे नव्याने निर्माण करण्यात आली तर काही पदे व्यपगत करण्यात आली होती. त्यानुसार दि. १८ जून, २०१२ च्या शासन निर्णयान्वये मुख्य अभियंता, विद्युत यांचे अधिनस्त कार्यरत मंडळाची आस्थापना, लेखा, प्रशासन व तांत्रिक बाबींच्या अनुषंगाने बांधकाम व निरीक्षण शाखेचा एकत्रित विचार करुन मुख्य अभियंता (विद्युत) यांच्या अधिपत्याखाली विद्युत व निरीक्षण मंडळांची फेररचना करण्यात आली.

उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक २६ फेब्रुवारी, २०१५ च्या शासन निर्णयान्वये सार्वजनिक बांधकाम विभागाकडील विद्युत निरीक्षण शाखा ऊर्जा विभागाच्या अधिपत्याखाली आणण्यात आली. सदर शासन निर्णय निर्गमित होण्यापूर्वी सार्वजनिक बांधकाम विद्युत विभागांतर्गत बांधकाम व निरीक्षण शाखेत कार्यरत असणारे सर्व अभियंते व कर्मचारी यांच्या पदांचे एकत्रितरित्या सेवायोजन करण्यात येत होते व सेवाजेष्ठता एकत्रित ठेवण्यात येत होती. सार्वजनिक बांधकाम विभागाकडील विद्युत निरीक्षण शाखा ऊर्जा विभागाच्या

नियंत्रणाखाली आणल्यामुळे सार्वजनिक बांधकाम विभागाकडील विद्युत विभागातील कर्मचारी वर्ग व वाढीव कार्यभार यामध्ये असमतोल निर्माण झाला आहे. त्यामुळे सा. बां.विद्युत विभागामधील पदांचा फेर आढावा घेवून सुधारणा करणे अनिवार्य आहे. सदर शासन निर्णयान्वये झालेल्या विभाजनामुळे एकत्रित स्वरूपातील सा. बां. विभागामधील बहुतांश अभियंत्यांना उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने त्यांच्या नियंत्रणाखाली आणल्यामुळे सा.बां.विद्युत विभागाचा कार्यभार, नवीन जिल्हयांची निर्मिती, विविध विकास योजना, विद्युत विभागातील विविध यंत्रसामुग्रीमध्ये (अग्निशमन, अग्निसूचक यंत्रणा, मध्यवर्ती वातानुकुलित यंत्रणा, दृकश्राव्य यंत्रणा, सी.सी.टी.व्ही. यंत्रणा, उद्वाहने, सरकते जिने) झालेली वाढ व पर्यायाने कमी अधिकारी/कर्मचारी व त्यांच्यावरील जास्त अत्यावश्यक सेवेची जबाबदारी यामुळे यंत्रणेवर असह्य ताण पडलेला आहे. तसेच विद्युत शाखेतील तांत्रिक कामकाजातील गुणवत्तावर्धन होण्याच्या दृष्टीने दक्षता व गुणनियंत्रण मंडळाच्या स्थापनेची आवश्यकता, विद्युत शाखेचे बळकटीकरण व विस्तारीकरण इ.साठी मानव संसाधनाची आवश्यकता विचारात घेता, फेररचनेसह वाढीव पदांचा प्रस्ताव प्रथम सचिव उपसमितीसमोर दि. ११ जून, २०१९ रोजी सादर करण्यात आला व सचिव उपसमितीने सर्व पदांचा आढावा घेऊन शिफारस केल्याप्रमाणे उच्चस्तरीय सचिव समितीसमोर दि. १७ जुलै, २०२० च्या बैठकीत प्रस्ताव सादर करण्यात आला होता. उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेनंतर दि. २९ ऑक्टोबर, २०२० रोजी सदर प्रस्ताव मा. मंत्रीमंडळाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. मा. मंत्रिमंडळाच्या मान्यतेनुसार मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई यांच्या कार्यालयाचा तसेच त्यांच्या अधिपत्याखालील राज्यामधील कार्यालयांच्या सुधारित आकृतीबंधाबाबत शासनाने खालील निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखालील विद्युत शाखेच्या कार्यालयीन तसेच बाह्यक्षेत्रिय आस्थापनेवर असलेल्या ३९ संवर्गातील पदांचा आढावा घेऊन एकूण ७१६ पदांच्या (सोबत जोडलेल्या "विवरणपत्र अ" व "विवरणपत्र अ-१" प्रमाणे) तसेच ३६८ अधिसंख्य पदांच्या (सोबत जोडलेल्या "विवरणपत्र ब व ब-१" प्रमाणे) सुधारित आकृतीबंधास या शासन निर्णयाद्वारे मंजुरी देण्यात येत आहे.

२. तसेच विद्युत शाखेतील तांत्रिक कामकाजातील गुणवत्तावर्धन होण्याच्या दृष्टीने व विद्युत शाखेच्या बळकटीकरणाची आवश्यकता विचारात घेता, राज्यात विद्युत शाखेकरिता दोन विद्युत मंडळ कार्यालये, एक दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, सहा सार्वजनिक बांधकाम विद्युत विभाग व बारा सार्वजनिक बांधकाम विद्युत उपविभाग नव्याने निर्माण करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजुरी देण्यात येत आहे.

३. प्रादेशिक विद्युत मंडळ, मुंबई; प्रादेशिक विद्युत मंडळ, नांदेड व दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, औरंगाबाद कार्यालयासाठी अनुक्रमे अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विद्युत मंडळ , मुंबई व नांदेड तसेच अधीक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, औरंगाबाद यांना या शासन निर्णयान्वये कार्यालय प्रमुख घोषित करण्यात येत आहे. सदरचे कार्यालय प्रमुख संबंधित मंडळ कार्यालयातील कार्यालय प्रमुखाच्या सर्व जबाबदा-या पार पाडतील. तसेच नव्याने निर्माण करण्यात येत असलेल्या सहा विभागांसाठी संबंधित कार्यकारी अभियंता यांना या शासन निर्णयाद्वारे कार्यालय प्रमुख म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदरचे कार्यालय प्रमुख संबंधित विभागामधील कार्यालय प्रमुखाच्या सर्व जबाबदा-या पार पाडतील.

४. सदर शासन निर्णयासोबतच्या “विवरणपत्र अ” मध्ये दर्शविलेल्या संवर्गातील रिक्त पदांवर वित्त विभागाने वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार पदभरती करण्यात येईल.

५. सुधारित आकृतीबंधानुसार कार्यालयीन आस्थापनेवर अतिरिक्त ठरलेल्या १६९ पदांपैकी रिक्त असलेल्या १०५ पदांचा व कार्यरत असलेल्या ६४ पदांचा तपशील सोबतच्या “विवरणपत्र ब” मध्ये दर्शविण्यात आला आहे. बाह्यक्षेत्रिय आस्थापनेवर अतिरिक्त ठरलेल्या ४५३ पदांपैकी रिक्त असलेल्या १४९ पदांचा व कार्यरत असलेल्या ३०४ पदांचा तपशील “विवरणपत्र ब-१” मध्ये दर्शविण्यात आला आहे.

६. तसेच सदर शासन निर्णयासोबतच्या “विवरणपत्र ब व ब-१” मधील स्तंभ क्र. ४ मध्ये नमूद अनुक्रमे ६४ व ३०४ अशी एकूण ३६८ पदे अधिसंख्य पदे म्हणून घोषित करण्यात येत आहेत. सदर ३६८ पदांवरील कर्मचा-यांचे अन्य पदांवर समायोजन होणे / स्वेच्छानिवृत्ती / सेवानिवृत्ती / मृत्यू / राजीनामा इ. कारणांमुळे पदे रिक्त झाल्यास, सदरची अधिसंख्य पदे आपोआप व्यपगत होतील.

७. मुख्य अभियंता (विद्युत) अंतर्गत विद्युत शाखेतील कार्यालयांचे जिल्हानिहाय भौगोलिक कार्यक्षेत्र सदर शासन निर्णयासोबतच्या “विवरणपत्र-क” मध्ये दर्शविण्यात आले आहे. तसेच मंजूर आकृतीबंधानुसार मुख्य अभियंता (विद्युत), मंडळ (विद्युत), विभागीय (विद्युत), उपविभागीय (विद्युत) कार्यालयांचा कार्यालयनिहाय तपशील “विवरणपत्र-ड” मध्ये दर्शविण्यात आला आहे. त्याचबरोबर सुधारित आकृतीबंधानुसार एकूण मंजूर व अधिसंख्य कार्यालयीन पदांचे कार्यालयनिहाय विवरण “विवरणपत्र- इ” मध्ये व सुधारित आकृतीबंधानुसार अधिसंख्य बाह्यक्षेत्रिय पदांचे कार्यालयनिहाय विवरण “विवरणपत्र इ-१” मध्ये दर्शविण्यात आले आहे.

८. सदर शासन निर्णयानुसार निश्चित करण्यात आलेल्या तसेच अधिसंख्य ठरलेल्या कर्मचा-यांच्या वेतन व भत्त्यांचा खर्च यापूर्वी ज्या लेखाशीर्षाखाली वेतन घेत होते, त्याच लेखाशीर्षाखाली यापुढेही खर्ची टाकण्यात यावा.

९. सदर शासन निर्णय उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि. १७ जुलै, २०२० रोजीच्या बैठकीत तसेच मा. मंत्रिमंडळाच्या दि. २९ ऑक्टोबर, २०२० रोजीच्या बैठकीत मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २४१/आपुक, दि. १७ सप्टेंबर, २०२० अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२०१११७१६४७२६०६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vikram Nivrutti Dhamal

Digitally signed by Vikram Nivrutti Dhamal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=23b2f1b1fd914a87080cb68712db5efd17f65e69284fe1d3274a32de69eb6a25, serialNumber=10d36944a4b86eab516b1b70183709c5fb570cfdf5a52755adfef51ed380b836, cn=Vikram Nivrutti Dhamal
Date: 2020.11.17 16:49:34 +05'30'

**( वि. नि. ढमाळ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा. मंत्री / मा. राज्यमंत्री (सा.बां.) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा व विधानपरिषद यांचे खाजगी सचिव
३. अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ३२.
४. सचिव (रस्ते) व सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
५. प्र. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई.
९. सर्व सह सचिव / उप सचिव सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. उपसचिव, मा. मुख्य सचिव, यांचे कार्यालय
११. सर्व अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, वान्द्रे (पूर्व), मुंबई.
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५. कार्यासन आपुक / व्यय-११, वित्त विभाग.
१६. सर्व कार्यासने, सार्वजनिक बांधकाम विभाग.
१७. कार्यासन प्रशासन-१, सार्वजनिक बांधकाम विभाग, (निवडनस्ती).

सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. ईएसटी-२०१६/प्र.क्र.८०/प्रशासन-१

दि. १७ नोव्हेंबर, २०२० सोबतचे सहपत्र.

## विवरणपत्र-अ

## सार्वजनिक बांधकाम विभाग, विद्युत शाखेच्या कार्यालयीन आस्थापनेचा सुधारित आकृतीबंध

| अ. क्र | संवर्ग /पदनाम | पदाची वेतनश्रेणी ( ७ व्या वेतन आयोगानुसार) | शासन निर्णय दि . ३.१०.२०११ नुसार मंजूर पदे | दि. १७.०७.२०२० रोजी उच्चस्तरीय सचिव समितीने व दि. २९ ऑक्टोबर, २०२० च्या मा. मंत्रिमंडळ बैठकीत मंजूर केलेला सुधारित आकृतीबंध | वाढ / घट |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | मुख्य अभियंता विद्युत | एस -२९ -१३११००-२१६१०० | १ | १ | ० |
| २ | अधिक्षक अभियंता विद्युत | एस -२५ -७८८००-२०९२०० | २ | ५ | +३ |
| ३ | सहायक मुख्य अभियंता | एस -२३-६७७००-२०८७०० | १ | २ | +१ |
| ४ | कार्यकारी अभियंता/ का.अ. रजा-नि प्रशिक्षण राखीव | एस -२३-६७७००-२०८७०० | १३ | २० | +७ |
| ५ | सहायक अधिक्षक अभियंता | एस -२० -५६१००-१७७५०० | ५ | १ | -४ |
| ६ | उप अभियंता | एस -२० -५६१००-१७७५०० | ५८ | ७१ | +१३ |
| ७ | कनिष्ठ अभियंता/ शाखा अभियंता / सहायक अभियंता- श्रेणी२ | एस -१४ -३८६००-१२२८०० | १६३ | १८३ | +२० |
| ८ | विशेष अधीक्षक | एस -१५ -४१८००-१३२३०० | १ | १ | ० |
| ९ | अधीक्षक | एस -१४ -३८६००-१२२८०० | १ | १ | ० |
| १० | प्रमुख आरेखक | एस -१५ -४१८००-१३२३०० | ४ | ० | -४ |
| ११ | विभागीय लेखापाल | एस -१३ -३५४००-११२४०० | १२ | १८ | +६ |
| १२ | प्रमुख लिपीक | एस -१३ -३५४००-११२४०० | १८ | ५ | -१३ |
| १३ | लघुलेखक उ श्रेणी | एस -१५ -४१८००-१३२३०० | १ | १ | ० |
| १४ | लघुलेखक (निम्न श्रेणी) | एस -१४ -३८६००-१२२८०० | १ | १ | ० |
| १५ | आरेखक | एस -१० -२९२००-९२३०० | १२ | ० | -१२ |
| १६ | भांडारपाल | एस -१३ -३५४००-११२४०० | १२ | २ | -१० |
| १७ | वरिष्ठ लिपीक | एस -८ -२५५००-८११०० | १०३ | १०३ | ० |

| **अ. क्र** | **संवर्ग /पदनाम** | **पदाची वेतनश्रेणी ( ७ व्या वेतन आयोगानुसार)** | **शासन निर्णय दि . ३.१०.२०११ नुसार मंजूर पदे** | **दि. १७.०७.२०२० रोजी उच्चस्तरीय सचिव समितीने व दि. २९ ऑक्टोबर, २०२० च्या मा. मंत्रिमंडळ बैठकीत मंजूर केलेला सुधारित आकृतीबंध** | **वाढ / घट** |
|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** |
| १८ | अनुरेखक | एस -७ -२१७००-६९१०० | ३८ | ० | -३८ |
| १९ | कनिष्ठ लिपीक/टंकलेखक (डाटा एन्ट्री ऑपरेटर) | एस -६ -१९९००-६३२०० | १८५ | १२८ | -५७ |
| २० | सहायक भांडारपाल | एस -६ -१९९००-६३२०० | ३ | ० | -३ |
| २१ | जीप चालक / वाहन चालक | एस -६ -१९९००-६३२०० | ४० | २६ | -१४ |
| २२ | नाईक | एस -३ -१६६००-५२४०० | १३ | १३ | ० |
| २३ | शिपाई | एस -१ -१५०००-४७६०० | १३६ | १३४ | -२ |
| २४ | चौकीदार | एस -१ -१५०००-४७६०० | १२ | ० | -१२ |
| | | **एकूण** | **८३५** | **७१६** | **-११९** |

सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. ईएसटी-२०१६/प्र.क्र.८०/प्रशासन-१
दि. १७ नोव्हेंबर, २०२० सोबतचे सहपत्र.

**विवरणपत्र-अ १**

**सार्वजनिक बांधकाम विभाग, विद्युत शाखेच्या बाह्यक्षेत्रिय आस्थापनेचा सुधारित आकृतीबंध**

| अ. क्र | संवर्ग / पदनाम | पदाची वेतनश्रेणी ( ७ व्या वेतन आयोगानुसार ) | शासन निर्णय दि . ३.१०.२०११ नुसार मंजूर पदे | दि. १७.०७.२०२० रोजी उच्चस्तरीय सचिव समितीने व दि. २९ ऑक्टोबर, २०२० च्या मा. मंत्रिमंडळ बैठकीत मंजूर केलेला सुधारित आकृतीबंध | वाढ / घट |
|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** |
| १ | वीजतंत्री | एस -८ -२५५००-८११०० | ५ | ० | -५ |
| २ | प्रशितक यांत्रीक | एस -८ -२५५००-८११०० | २ | ० | -२ |
| ३ | इलेक्ट्रॉनिक यांत्रीक | एस -८ -२५५००-८११०० | १ | ० | -१ |
| ४ | प्रमुख तारतंत्री | एस -७ -२१७००-६९१०० | १२ | ० | -१२ |
| ५ | मीटरवाचक | एस -६ -१९९००-६३२०० | २ | ० | -२ |
| ६ | तारतंत्री | एस -६ -१९९००-६३२०० | १५० | ० | -१५० |
| ७ | तारमार्ग तंत्री | एस -६ -१९९००-६३२०० | ५ | ० | -५ |
| ८ | वातानुकुल चालक | एस -६ -१९९००-६३२०० | २ | ० | -२ |
| ९ | इलेक्ट्रॉनिक यांत्रीक-नि-चालक | एस -६ -१९९००-६३२०० | २ | ० | -२ |
| १० | इंजिन चालक (डिझेल) * | एस -६ -१९९००-६३२०० | १ | ० | -१ |
| ११ | सहा. इलेक्ट्रॉनिक यांत्रीक-नि-चालक | एस -३ -१६६००-५२४०० | २ | ० | -२ |
| १२ | सहायक वातानुकुल चालक | एस -३ -१६६००-५२४०० | १ | ० | -१ |
| १३ | उद्वाहन चालक | एस -३ -१६६००-५२४०० | ५० | ० | -५० |
| १४ | पंप परिचर | एस -३ -१६६००-५२४०० | १८ | ० | -१८ |
| १५ | मजूर | एस -१ -१५०००-४७६०० | २०० | ० | -२०० |
| | | | **४५३**** | **०** | **-४५३** |

**टीप- *इंजिन चालक (डिझेल) हे पद दि. ०३ ऑक्टोबर, २०११ च्या शासन निर्णयानुसार मंजूर करण्यात आले आहे. सदरचा संवर्ग उपरोक्त नमूद शासन निर्णयामधील अटीनुसार नामशेष झाला आहे.**

**** सदर ४५३ पदांपैकी कार्यरत असलेल्यांचा तपशील सोबतच्या “विवरणपत्र ब-१” मध्ये दर्शविण्यात आला असून ३०४ पदे अधिसंख्य म्हणून कार्यरत राहतील.**

सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. ईएसटी-२०१६/प्र.क्र.८०/प्रशासन-१
दि. १७ नोव्हेंबर, २०२० सोबतचे सहपत्र.

**विवरणपत्र - ब**

**सुधारित आकृतीबंधानुसार विद्युत शाखेच्या कार्यालयीन आस्थापनेवरील अतिरिक्त घोषित करण्यात आलेल्या पदांचा तपशील -**

| अ. क्र | संवर्ग /पदनाम | पदाची वेतनश्रेणी ( ७ व्या वेतन आयोगानुसार ) | पदांची संख्या | | अतिरिक्त घोषित करण्यात आलेल्या पदांची एकूण संख्या |
|---|---|---|---|---|---|
| | | | कार्यरत | रिक्त | |
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** |
| १ | सहायक अधिक्षक अभियंता | एस -२० -५६१००-१७७५०० | ०१ | ०३ | ०४ |
| २ | प्रमुख आरेखक | एस -१५ -४१८००-१३२३०० | ०१ | ०३ | ०४ |
| ३ | प्रमुख लिपीक | एस -१३ -३५४००-११२४०० | ०२ | ११ | १३ |
| ४ | आरेखक | एस -१० -२९२००-९२३०० | ०२ | १० | १२ |
| ५ | भांडारपाल | एस -१३ -३५४००-११२४०० | ०६ | ०४ | १० |
| ६ | सहायक भांडारपाल | एस -६ -१९९००-६३२०० | ० | ३ | ३ |
| ७ | अनुरेखक | एस -७ -२१७००-६९१०० | १८ | २० | ३८ |
| ८ | कनिष्ठ लिपीक/टंकलेखक (डाटा एन्ट्री ऑपरेटर) | एस -६ -१९९००-६३२०० | १९ | ३८ | ५७ |
| ९ | जीप चालक / वाहन चालक | एस -६ -१९९००-६३२०० | ०५ | ०९ | १४ |
| १० | शिपाई | एस -१ -१५०००-४७६०० | ० | ०२ | ०२ |
| ११ | चौकीदार | एस -१ -१५०००-४७६०० | १० | ०२ | १२ |
| | | **एकूण** | **६४** | **१०५** | **१६९** |

**टीप** - उपरोक्त नमूद तक्त्यामधील स्तंभ क्र. ४ मधील नमूद करण्यात आलेल्या ६४ पदांवर अधिकारी / कर्मचारी कार्यरत असल्यामुळे ६४ पदे अधिसंख्य घोषित करण्यात येत आहेत. सदर पदावरील अधिकारी / कर्मचारी यांच्या पदोन्नती / स्वेच्छानिवृत्ती / सेवानिवृत्ती / मृत्यू / राजीनामा इ. कारणांमुळे पदे रिक्त झाल्यास सदर पदे आपोआप व्यपगत होतील.

सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. ईएसटी-२०१६/प्र.क्र.८०/प्रशासन-१
दि. १७ नोव्हेंबर, २०२० सोबतचे सहपत्र.

## विवरणपत्र —ब - १

## सुधारित आकृतीबंधानुसार विद्युत शाखेच्या बाह्यक्षेत्रिय आस्थापनेवरील अतिरिक्त घोषित करण्यात आलेल्या पदांचा तपशील -

| अ. क्र | संवर्ग / पदनाम | पदाची वेतनश्रेणी ( ७ व्या वेतन आयोगानुसार ) | पदांची संख्या | | अतिरिक्त घोषित करण्यात आलेल्या पदांची एकूण संख्या |
|---|---|---|---|---|---|
| | | | कार्यरत | रिक्त | |
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** |
| १ | वीजतंत्री | एस -८ -२५५००-८११०० | ०१ | ०४ | ०५ |
| २ | प्रशितक यांत्रीक | एस -८ -२५५००-८११०० | ०२ | ० | ०२ |
| ३ | इलेक्ट्रॉनिक यांत्रीक | एस -८ -२५५००-८११०० | ०१ | ० | ०१ |
| ४ | प्रमुख तारतंत्री | एस -७ -२१७००-६९१०० | ०४ | ०८ | १२ |
| ५ | मीटरवाचक | एस -६ -१९९००-६३२०० | ० | ०२ | ०२ |
| ६ | तारतंत्री | एस -६ -१९९००-६३२०० | ७७ | ७३ | १५० |
| ७ | तारमार्ग तंत्री | एस -६ -१९९००-६३२०० | ० | ०५ | ०५ |
| ८ | वातानुकुल चालक | एस -६ -१९९००-६३२०० | ० | ०२ | ०२ |
| ९ | इलेक्ट्रॉनिक यांत्रीक-नि-चालक | एस -६ -१९९००-६३२०० | ० | ०२ | ०२ |
| १० | इंजिन चालक (डिझेल) | एस -६ -१९९००-६३२०० | ० | ०१ | ०१ |
| ११ | सहा. इलेक्ट्रॉनिक यांत्रीक-नि-चालक | एस -३ -१६६००-५२४०० | ० | ०२ | ०२ |
| १२ | सहायक वातानुकुल चालक | एस -३ -१६६००-५२४०० | ०१ | ० | ०१ |
| १३ | उद्वाहन चालक | एस -३ -१६६००-५२४०० | ४० | १० | ५० |
| १४ | पंप परिचर | एस -३ -१६६००-५२४०० | १३ | ०५ | १८ |
| १५ | मजूर | एस -१ -१५०००-४७६०० | १६५ | ३५ | २०० |
| | | | **३०४** | **१४९** | **४५३** |

**टीप** - उपरोक्त नमूद तक्त्यामधील स्तंभ क्र. ४ मधील नमूद करण्यात आलेली ३०४ पदे अधिसंख्य पदे घोषित करण्यात येत आहेत. सदर पदावरील कर्मचारी यांच्या पदोन्नती / स्वेच्छानिवृत्ती / सेवानिवृत्ती / मृत्यू / राजीनामा इ. कारणांमुळे रिक्त झाल्यास सदर पदे आपोआप व्यपगत होतील.

सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. ईएसटी-२०१६/प्र.क्र.८०/प्रशासन-१
दि. १७ नोव्हेंबर, २०२० सोबतचे सहपत्र.

**विवरणपत्र - क**

मुख्य अभियंता (विद्युत) अंतर्गत विद्युत शाखेतील प्रस्तावित कार्यालयांचे जिल्हानिहाय भौगोलिक कार्यक्षेत्र

| प्रस्तावित विद्युत प्रादेशिक मंडळ/जिल्हानिहाय तपशिल | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मंडळ | विभाग | | | | |
| (१) | **अधीक्षक अभियंता, मुंबई प्रादेशिक विद्युत मंडळ** | | | | |
| | **१** | कार्यकारी अभियंता, दक्षिण मुंबई विद्युत, सा.बां. विभाग | | | |
| | | (i) | मुंबई शहर | | |
| | **२** | कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई विद्युत, सा.बां. विभाग | | | |
| | | (i) | मुंबई शहर | | |
| | **३** | कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई विद्युत, सा.बां. विभाग | | | |
| | | (i) | मुंबई उपनगर | | |
| | **४** | कार्यकारी अभियंता, प्रकल्प विद्युत विभाग, सा.बां. विभाग, मुंबई **(जुने नांव : कार्यकारी अभियंता , कृषि बांधकाम विभाग क्र. ५ (विद्युत) मुंबई)** | | | |
| | | (i) | मुंबई शहर/उपनगर | | |
| | **५** | कार्यकारी अभियंता, ठाणे विद्युत, सा.बां. विभाग | | | |
| | | (i) | ठाणे | (ii) | पालघर |
| | **६** | **कार्यकारी अभियंता, रायगड विद्युत, सा.बां. विभाग** | | | |
| | | (i) | रायगड | (ii) | रत्नागिरी |
| | | (iii) | सिंधुदुर्ग | | |
| | **७** | कार्यकारी अभियंता, नाशिक विद्युत, सा.बां. विभाग | | | |
| | | (i) | नाशिक | (ii) | अहमदनगर |
| | **८** | **कार्यकारी अभियंता, धुळे विद्युत, सा.बां. विभाग** | | | |
| | | (i) | धुळे | (ii) | जळगांव |
| | | (iii) | नंदुरबार | | |
| (२) | **अधीक्षक अभियंता, पुणे प्रादेशिक विद्युत मंडळ** | | | | |
| | **९** | कार्यकारी अभियंता, पुणे विद्युत, सा.बां. विभाग | | | |
| | | (i) | पुणे | | |
| | **१०** | **कार्यकारी अभियंता, सोलापूर विद्युत, सा.बां. विभाग** | | | |
| | | (i) | सोलापूर | (ii) | सातारा |
| | **११** | कार्यकारी अभियंता, कोल्हापूर विद्युत, सा.बां. विभाग | | | |
| | | (i) | कोल्हापूर | (ii) | सांगली |
| (३) | **अधीक्षक अभियंता, नांदेड प्रादेशिक विद्युत मंडळ** | | | | |
| | **१२** | कार्यकारी अभियंता, औरंगाबाद विद्युत, सा.बां. विभाग | | | |
| | | (i) | औरंगाबाद | (ii) | जालना |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | **१३** | कार्यकारी अभियंता, उस्मानाबाद विद्युत, सा.बां. विभाग | | | |
| | | (i) | उस्मानाबाद | (ii) | बीड |
| | | (iii) | लातूर | | |
| | **१४** | **कार्यकारी अभियंता, नांदेड विद्युत, सा.बां. विभाग** | | | |
| | | (i) | नांदेड | (ii) | परभणी |
| | | (iii) | हिंगोली | | |
| (४) | **अधीक्षक अभियंता, नागपूर प्रादेशिक विद्युत मंडळ** | | | | |
| | **१५** | कार्यकारी अभियंता, नागपूर विद्युत, सा.बां. विभाग | | | |
| | | (i) | नागपूर | (ii) | भंडारा |
| | | (iii) | गोंदिया | | |
| | **१६** | **कार्यकारी अभियंता, चंद्रपूर विद्युत, सा.बां. विभाग** | | | |
| | | (i) | चंद्रपूर | (ii) | वर्धा |
| | | (iii) | गडचिरोली | | |
| | **१७** | कार्यकारी अभियंता, अमरावती विद्युत, सा.बां. विभाग | | | |
| | | (i) | अमरावती | (ii) | बुलढाणा |
| | | (iii) | अकोला | | |
| | **१८** | **कार्यकारी अभियंता, यवतमाळ विद्युत, सा.बां. विभाग** | | | |
| | | (i) | यवतमाळ | (ii) | वाशिम |
| (५) | **अधीक्षक अभियंता, दक्षता व गुण नियंत्रण मंडळ, औरंगाबाद कार्यक्षेत्र संपूर्ण महाराष्ट्र** | | | | |
| | १९ | **कार्यकारी अभियंता, -१** | | | |
| | | (i) | मुंबई शहर | (ii) | मुंबई उपनगर |
| | | (iii) | ठाणे | (iv) | पालघर |
| | | (v) | रायगड | (vi) | रत्नागिरी |
| | | (vii) | सिंधुदुर्ग | (viii) | नाशिक |
| | | (ix) | अहमदनगर | (x) | धुळे |
| | | (xi) | नंदूरबार | (xii) | जळगांव |
| | | (xiii) | पुणे | (xiv) | कोल्हापूर |
| | | (xv) | सोलापूर | (xvi) | सातारा |
| | | (xvii) | सांगली | | |
| | २० | **कार्यकारी अभियंता, -२** | | | |
| | | (i) | औरंगाबाद | (ii) | उस्मानाबाद |
| | | (iii) | नांदेड | (iv) | जालना |
| | | (v) | लातूर | (vi) | बीड |
| | | (vii) | परभणी | (viii) | हिंगोली |
| | | (ix) | नागपूर | (x) | गडचिरोली |
| | | (xi) | गोंदिया | (xii) | भंडारा |
| | | (xiii) | चंद्रपूर | (xiv) | वर्धा |
| | | (xv) | अमरावती | (xvi) | अकोला |
| | | (xvii) | यवतमाळ | (xviii) | बुलढाणा |
| | | (xix) | वाशिम | | |

सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. ईएसटी-२०१६/प्र.क्र.८०/प्रशासन-१
दि. १७ नोव्हेंबर, २०२० सोबतचे सहपत्र.

**<u>विवरणपत्र-ड</u>**

**मंजूर आकृतीबंधानुसार मुख्य अभियंता (विद्युत) सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे अधिपत्याखालील कार्यालयांचा तपशिल.**

| मंडळ कार्यालय | | विभाग कार्यालय | | उप विभागीय कार्यालये | |
|---|---|---|---|---|---|
| **अ** | अधीक्षक अभियंता, मुंबई प्रादेशिक (विद्युत) मंडळ, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई. **(नवनिर्मित)** | १ | कार्यकारी अभियंता, दक्षिण मुंबई विद्युत, सा.बां. विभाग | i. उप अभियंता, मंत्रालय विद्युत उपविभाग<br>ii. उप अभियंता, नवीन विधानभवन विद्युत उपविभाग | iii. उप अभियंता, मलबार टेकडी विद्युत उपविभाग<br>iv. उप अभियंता, शहर विद्युत उपविभाग |
| | | २ | कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई विद्युत, सा.बां. विभाग | i. उप अभियंता, जे.जे.रुग्णालय विद्युत उपविभाग<br>ii. उप अभियंता, दादर विद्युत उपविभाग | iii. उप अभियंता, वरळी विद्युत उपविभाग |
| | | ३ | कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई विद्युत, सा.बां. विभाग | i. उप अभियंता, मुलुंड विद्युत उपविभाग<br>ii. उप अभियंता, अंधेरी विद्युत उपविभाग | iii. उप अभियंता, वांद्रे विद्युत उपविभाग<br>iv. उप अभियंता, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली विद्युत उपविभाग **(नवनिर्मित)** |
| | | ४ | कार्यकारी अभियंता, प्रकल्प विद्युत, सा.बां. विभाग, मुंबई (जुने नांव : कार्यकारी अभियंता , कृषि बांधकाम विभाग क्र. ५ (विद्युत) मुंबई) | i. उप अभियंता, आरे विद्युत उपविभाग<br>ii. उप अभियंता, भोंगा विद्युत उपविभाग | iii. उप अभियंता, प्रकल्प विद्युत उपविभाग |
| | | ५ | कार्यकारी अभियंता, ठाणे विद्युत, सा.बां. विभाग | i. उप अभियंता, ठाणे विद्युत उपविभाग<br>ii. उप अभियंता, कल्याण विद्युत उपविभाग | iii. उप अभियंता, पालघर विद्युत उपविभाग **(नवनिर्मित)**<br>iv. उप अभियंता, नवी मुंबई विद्युत उपविभाग **(नवनिर्मित)** |
| | | ६ | कार्यकारी अभियंता, रायगड विद्युत, सा.बां. विभाग **(नवनिर्मित)** | i. उप अभियंता, रायगड विद्युत उपविभाग<br>ii. उप अभियंता, रत्नागिरी विद्युत उपविभाग | iii. उप अभियंता, सिंधुदुर्ग विद्युत उपविभाग |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | ७ | कार्यकारी अभियंता, नाशिक विद्युत, सा.बां. विभाग | i. उप अभियंता, नाशिक विद्युत उपविभाग<br>ii. उप अभियंता, अहमदनगर विद्युत उपविभाग | iii. उप अभियंता, मालेगांव विद्युत उपविभाग **(नवनिर्मित)** |
| | | ८ | कार्यकारी अभियंता, धुळे विद्युत विभाग **(नवनिर्मित)** | i. उप अभियंता, धुळे विद्युत उपविभाग<br>ii. उप अभियंता, जळगांव विद्युत उपविभाग | iii. उप अभियंता, नंदुरबार विद्युत उपविभाग **(नवनिर्मित)** |
| **ब** | अधीक्षक अभियंता, पुणे प्रादेशिक (विद्युत) मंडळ, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे | ९ | कार्यकारी अभियंता, पुणे विद्युत, सा.बां. विभाग | i. उप अभियंता, पुणे विद्युत उपविभाग क्र.१<br>ii. उप अभियंता, पुणे विद्युत उपविभाग क्र.२ | iii. उप अभियंता, ससून विद्युत उपविभाग **(नवनिर्मित)** |
| | | १० | कार्यकारी अभियंता, सोलापूर विद्युत, सा.बां. विभाग **(नवनिर्मित)** | i. उप अभियंता, सोलापूर विद्युत उपविभाग<br>ii. उप अभियंता, सातारा विद्युत उपविभाग | iii. उप अभियंता, अकलूज विद्युत उपविभाग **(नवनिर्मित)** |
| | | ११ | कार्यकारी अभियंता, कोल्हापूर विद्युत, सा.बां. विभाग | i. उप अभियंता, कोल्हापूर विद्युत उपविभाग क्र.१<br>ii. उप अभियंता, कोल्हापूर विद्युत उपविभाग क्र.२ **(नवनिर्मित)** | iii. उप अभियंता, मिरज विद्युत उपविभाग |
| **क** | अधीक्षक अभियंता, प्रादेशिक (विद्युत) मंडळ, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड. **(नवनिर्मित)** | १२ | कार्यकारी अभियंता, औरंगाबाद विद्युत, सा.बां. विभाग | i. उप अभियंता, औरंगाबाद विद्युत उपविभाग क्र.१<br>ii. उप अभियंता, औरंगाबाद विद्युत उपविभाग क्र.२ **(नवनिर्मित)** | iii. उप अभियंता, जालना विद्युत उपविभाग |
| | | १३ | कार्यकारी अभियंता, उस्मानाबाद विद्युत, सा.बां. विभाग | i. उप अभियंता, उस्मानाबाद विद्युत उपविभाग | iii. उप अभियंता, लातूर विद्युत उपविभाग |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | ii. उप अभियंता, बीड विद्युत उपविभाग | |
| | | १४ | कार्यकारी अभियंता, नांदेड विद्युत, सा.बां. विभाग **(नवनिर्मित)** | i. उप अभियंता, नांदेड विद्युत उपविभाग<br>ii. उप अभियंता, परभणी विद्युत उपविभाग | iii. उप अभियंता, हिंगोली विद्युत उपविभाग **(नवनिर्मित)** |
| **ड** | अधीक्षक अभियंता, नागपूर प्रादेशिक (विद्युत) मंडळ, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर | १५ | कार्यकारी अभियंता, नागपूर विद्युत, सा.बां. विभाग | i. उप अभियंता, नागपूर विद्युत उपविभाग क्र.१<br>ii. उप अभियंता, नागपूर विद्युत उपविभाग क्र.२ | iii. उप अभियंता, वैद्यकिय महाविद्यालय व रुग्णालय विद्युत उपविभाग<br>iv. उप अभियंता, भंडारा विद्युत उपविभाग<br>v. उप अभियंता, गोंदिया विद्युत उपविभाग **(नवनिर्मित )** |
| | | १६ | कार्यकारी अभियंता, चंद्रपूर विद्युत, सा.बां. विभाग **(नवनिर्मित)** | i. उप अभियंता, चंद्रपूर विद्युत उपविभाग<br>ii. उप अभियंता, वर्धा विद्युत उपविभाग | iii. उप अभियंता, गडचिरोली विद्युत उपविभाग |
| | | १७ | कार्यकारी अभियंता, अमरावती विद्युत, सा.बां. विभाग | i. उप अभियंता, अमरावती विद्युत उपविभाग<br>ii. उप अभियंता, बुलढाणा विद्युत उपविभाग | iii. उप अभियंता, अकोला विद्युत उपविभाग |
| | | १८ | कार्यकारी अभियंता, यवतमाळ विद्युत, सा.बां. विभाग **(नवनिर्मित)** | i. उप अभियंता, यवतमाळ विद्युत उपविभाग | ii. उप अभियंता, वाशिम विद्युत उपविभाग **(नवनिर्मित)** |

| | | | कक्ष | कार्यक्षेत्र | |
|---|---|---|---|---|---|
| **इ** | अधीक्षक अभियंता, दक्षता व गुण नियंत्रण मंडळ, सार्वजनिक बांधकाम विभाग. **(नवनिर्मित)** | १९ | कार्यकारी अभियंता-१, **(नवनिर्मित)** | i. मुंबई शहर<br>ii. मुंबई उपनगर<br>iii. ठाणे<br>iv. पालघर<br>v.रायगड<br>vi. रत्नागिरी<br>vii.सिंधुदुर्ग<br>viii. नाशिक<br>ix.अहमदनगर | x. धुळे<br>xi. नंदुरबार<br>xii. जळगांव<br>xiii. पुणे<br>xiv. कोल्हापूर<br>xv. सोलापूर<br>xvi. सातारा<br>xvii. सांगली |
| | | २० | कार्यकारी अभियंता-२, **(नवनिर्मित)** | i. औरंगाबाद<br>ii. उस्मानाबाद<br>iii. नांदेड<br>iv. जालना<br>v. लातूर<br>vi. बीड<br>vii. परभणी<br>viii. हिंगोली<br>ix.नागपूर<br>x. गडचिरोली | xi. गोंदिया<br>xii. भंडारा<br>xiii. चंद्रपूर<br>xiv. वर्धा<br>xv.अमरावती<br>xvi. अकोला<br>xvii. यवतमाळ<br>xviii. बुलढाणा<br>xix. वाशिम |

**सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. ईएसटी-२०१६/प्र.क्र.८०/प्रशासन-१**
**दि. १७ नोव्हेंबर, २०२० सोबतचे सहपत्र.**

**विवरणपत्र- इ**
**सुधारित आकृतीबंधानुसार एकूण मंजूर व अधिसंख्य कार्यालयीन पदांचे कार्यालयनिहाय विवरणपत्र.**

| अ. क्र. | पदनाम | मंजूर पदसंख्या | कार्यरत अधिसंख्य पदे | मुख्य अभियंता कार्यालय | दक्षता व गुण नियंत्रण मंडळ | मंडळ कार्यालये | विभागीय कार्यालये | उप विभागीय कार्यालये | एकूण मंजूर पदे | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | कार्यालयांची संख्या | | | | | ४ | १८ | ५८ | | |
| १) | मुख्य अभियंता | १ | ० | १ | ० | ० | ० | ० | १ | |
| २) | अधीक्षक अभियंता | ५ | ० | ० | १ | ४ | ० | ० | ५ | |
| ३) | सहाय्यक मुख्य अभियंता | २ | ० | २ | ० | ० | ० | ० | २ | |
| ४) | कार्यकारी अभियंता | २० | ० | ० | २ | ० | १८ | ० | २० | |
| ५) | सहाय्यक अधीक्षक अभियंता | १ | • १ | ० | १ | • १ | ० | ० | १ | •१ नागपूर प्रादेशिक विद्युत मंडळ |
| ६) | उप अभियंता | ७१ | ० | ४ | ५ | ४ | ० | ५८ | ७१ | |
| ७) | कनिष्ठ अभियंता / शाखा अभियंता / सहाय्यक अभियंता श्रेणी - २ | १८३ | ० | ४ | ० | ४ x २ = ८ | १८ | ३७ x ३ = १११<br>२१ x २ = ४२ | १८३ | २१*२ विधानभवन, दादर, नवी दिल्ली, आरे, भोंगा, पालघर , नवी मुंबई, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, पुणे २, अकलूज, कोल्हापूर क्र. २, औरंगाबाद क्र.२, बीड , हिंगोली, मालेगांव, नंदुरबार, भंडारा, चंद्रपूर, गोंदिया, वाशिम |
| ८) | विशेष अधीक्षक | १ | ० | १ | ० | ० | ० | ० | १ | |
| ९) | अधीक्षक | १ | ० | १ | ० | ० | ० | ० | १ | |
| १०) | प्रमुख आरेखक | ० | •१ | ० | ० | ० | ० | ० | ० | •१ नागपूर प्रादेशिक विद्युत मंडळ |
| ११) | लघुलेखक (उच्चस्तर) | १ | ० | १ | ० | ० | ० | ० | १ | |
| १२) | लघुलेखक (निम्नस्तर) | १ | ० | ० | १ | ० | ० | ० | १ | |
| १३) | विभागीय लेखापाल | १८ | ० | ० | ० | ० | १८ | ० | १८ | |
| १४) | प्रमुख लिपीक | ५ | •८ | १ | ० | ४ | •८ | ० | ५ | •८ विभागीय कार्यालय - दक्षिण मुंबई, मध्य मुंबई, उत्तर मुंबई, ठाणे, पुणे, कोल्हापूर, नाशिक, उस्मानाबाद, |

| अ. क्र. | पदनाम | मंजूर पदसंख्या | कार्यरत अधिसंख्य पदे | मुख्य अभियंता कार्यालय | दक्षता व गुण नियंत्रण मंडळ | मंडळ कार्यालये | विभागीय कार्यालये | उप विभागीय कार्यालये | एकूण मंजूर पदे | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १५) | आरेखक | ० | •१ | ० | ० | ० | •१ | ० | ० | •१ विभागीय कार्यालय - औरंगाबाद |
| १६) | भांडारपाल | २ | •६ | ० | ० | ० | २ (दक्षिण मुंबई, नागपूर) + •६ | ० | २ | •६ विभागीय कार्यालय - मध्य मुंबई, ठाणे, पुणे, कोल्हापूर, नाशिक, औरंगाबाद |
| १७) | वरिष्ठ लिपीक | १०३ | ० | ३ | २ | ४ x ४ = १६ | १८ + *६ | ५८ | १०३ | *६ विभागीय कार्यालय - दक्षिण मुंबई, पुणे, औरंगाबाद, नाशिक, नागपूर, अमरावती |
| १८) | अनुरेखक | ० | •१६ | ० | ० | ० | •२ | •१४ | ० | •१६ विभागीय कार्यालय - औरंगाबाद, अमरावती<br>उपविभागीय कार्यालय - मुंबई शहर, सोलापूर, नाशिक, धुळे, जळगांव, अहमदनगर, औरंगाबाद, बीड, लातूर, नागपूर क्र.१, नागपूर क्र.२, भंडारा, अमरावती, अकोला |
| १९) | कनिष्ठ लिपीक नि टंकलेखक / डाटा एन्ट्री ऑपरेटर | १२८ | •१९ | २ | २ | ४ x ३ = १२ •२ | १८ x ३ = ५४ •१७ | ५८ | १२८ | •१९ मुंबई-३, पुणे-३, नाशिक-२, औरंगाबाद-५, नागपूर-५,अमरावती-१ |
| २०) | जीप चालक | २६ | •३ | १ | ३ | ४ | १८ | •५ | २६ | •३ उपविभागीय कार्यालय - पेण, पुणे क्र.२, परभणी |
| २१) | नाईक | १३ | ० | १ | १ | ४ | *७ | ० | १३ | *७ दक्षिण मुंबई, उत्तर मुबंई, ठाणे, पुणे, औरंगाबाद, नाशिक, नागपूर |
| २२) | शिपाई | १३४ | ० | ४ | ३ | ४ x ३ = १२ | १८ x ३ = ५४ +३ | ५८ | १३४ | ३ दक्षिण मुंबई, पुणे, नागपूर |
| २३) | चौकीदार | ० | •९ | ० | ० | ० | •५ | •४ | ० | •९ विभागीय कार्यालय - पुणे, नाशिक, औरंगाबाद, उस्मानाबाद, नागपूर.<br>उपविभागीय कार्यालय - नाशिक, जळगांव, नांदेड, नागपूर क्र.१, |
| | **एकूण** | **७१६** | **६४** | | | | | | **७१६** | |

• **अधिसंख्य पदे**

सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. ईएसटी-२०१६/प्र.क्र.८०/प्रशासन-१
दि. १७ नोव्हेंबर, २०२० सोबतचे सहपत्र.

**विवरणपत्र - इ-१**

सुधारित आकृतीबंधानुसार अधिसंख्य बाह्यक्षेत्रिय पदांचे कार्यालयनिहाय विवरणपत्र.

| अ.क्र. | पदनाम | विभागीय कार्यालयातील बाह्यक्षेत्रिय अधिसंख्य पदे | शेरा |
|---|---|---|---|
| | कार्यालयांची संख्या | १८ | |
| १) | वीजतंत्री | २ | •२ मंत्रालय, ठाणे |
| २) | वीजतंत्री-नि-वीजयांत्रिक | ० | |
| ३) | उद्वाहन यांत्रिक | ० | |
| ४) | प्रशितक यांत्रिक | २ | •२ मंत्रालय, मलबार टेकडी |
| ५) | इलेक्ट्रॉनिक्स यांत्रिक | १ | •१ नवीन विधानभवन |
| ६) | प्रमुख तारतंत्री | ९ | •९ मुंबई शहर, मलबार टेकडी,वरळी, रुग्णालय, ठाणे, कल्याण, पुणे क्र.१, पुणे क्र.२-२ |
| ७) | यांत्रिक | ० | |
| ८) | मीटर वाचक | ० | |
| ९) | तारतंत्री | १२० | •१२० विद्युत विभाग - दक्षिण मुंबई ३५, मध्य मुंबई ९, उत्तर मुंबई ३,प्रकल्प मुंबई ६, ठाणे ६, पुणे १५, कोल्हापूर ९, नाशिक १, नागपूर २४, अमरावती १२ |
| १०) | तारमार्गतंत्री | ० | |
| ११) | वातानुकूल चालक | ० | |
| १२) | इलेक्ट्रॉनिक यांत्रिक नि चालक | ० | |
| १३) | पंपयांत्रिक | ० | |
| १४) | रंगारी | ० | |
| १५) | सुतार | ० | |
| १६) | गवंडी | ० | |
| १७) | इंजिनचालक (डिझेल) | ० | |
| १८) | तेलवाला | ० | |
| १९) | पंपचालक | ० | |
| २०) | सहाय्यक तारतंत्री | ० | |
| २१) | सहाय्यक इलेक्ट्रॉनिक्स यांत्रिक नि चालक | ० | |
| २२) | सहाय्यक वातानुकूल चालक | १ | •१ नवीन विधानभवन |
| २३) | उद्वाहन चालक | ३६ | •३६ मंत्रालय ३०, मुंबई शहर २, मलबार टेकडी २, पुणे क्र.१ - २ |
| २४) | पंपपरिचर | १२ | •१२ दक्षिण मुंबई ४, प्रकल्प मुंबई १, पुणे ५, नागपूर २ |
| २५) | स्वच्छक | ० | |
| २६) | मजदूर | १२१ | •१२१ दक्षिण मुंबई ३०, मध्य मुंबई १७, उत्तर मुंबई ८, प्रकल्प मुंबई ४, ठाणे ६, पुणे २४, अमरावती १० |
| २७) | एकूण | ३०४ | |

- **अधिसंख्य पदे**